5

20140828160338 1323

**माथेरान, पाचगणी, लोणावळा, पन्हाळा, महाबळेश्वर या गिरीस्थान नगरपरिषदांनी पर्यटन मार्गदर्शक/शिपायांचा पगार व लिपिकाचे विशेष वेतन इत्यादी स्वरुपात केलेल्या खर्चाचा परतावा करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

शासन निर्णय क्र.टीडीएस - २००८/१०/प्र.क्र.४१५/पर्यटन,
पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,
दिनांक :२४ फेब्रुवारी, २००९

**वाचा :-** १) शासन निर्णय, क्र.सामान्य प्रशासन विभाग क्र.डोटीटी ३५६५/ २७५५ /डो, दिनांक ११.१. १९६५

**शासन निर्णय :** पर्यटक केंद्र उभारणे या योजनेतंर्गत प्रत्येकी एका पर्यटन मार्गदर्शक/ शिपायाचा पगार व एका लिपिकाचे विशेष वेतनासाठी केलेल्या खर्चाचा परतावा करण्याकरीता सन २००८-०९ याआर्थिक वर्षात रू. १६५०००/-(रुपये एक लाख पासष्ट हजार फक्त) च्या नियतव्ययास मंजूरी देण्यात आली असून खालील प्रमाणे अनुदान अदा करण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

| नगर परिषद | खर्चाचे वर्ष | खर्चाचा परतावा | खालील नावे धनादेश काढावेत |
|---|---|---|---|
| १) माथेरान नगर परिषद, जिल्हा रायगड | २००७-०८ | २२००० | मुख्याधिकारी, माथेरान नगर परिषद, जिल्हाः- रायगड (The Chief Officer, Matheran Hill-Station Municipal Council, Dis-Raigad) |
| २) पांचगणी नगर परिषद, जिल्हा सातारा | २००७-०८ | ३८००० | मुख्याधिकारी, पांचगणी नगर परिषद, जिल्हाः-सातारा (The Chief Officer, Panchgani Hill-Station Municipal Council, Dis-Satara) |
| ३) लोणावळा नगर परिषद, जिल्हा पुणे | २००७-०८ | २६००० | मुख्याधिकारी, लोणावळा नगर परिषद, जिल्हाः- पुणे (The Chief Officer, Lonavala Hill-Station Municipal Council, Dis-Pune) |
| ४) पन्हाळा नगर परिषद, जिल्हा कोल्हापूर | २००७-०८ | ३६००० | मुख्याधिकारी, पन्हाळा नगर परिषद, जिल्हाः-कोल्हापूर (The Chief Officer, Panhala Hill-Station Municipal Council, Dist.-Kolhapur) |
| ५)महाबळेश्वर नगरपरिषद, जिल्हा सातारा | २००७-०८ | ४३००० | मुख्याधिकारी, महाबळेश्वर नगरपरिषद, जिल्हा सातारा (The Chief Officer, Mahabaleshwar Municipal Council, Dist.-Satara) |
| | | **१,६५,०००** | |

D:\MEHER JAN २००८\note Paryatan kendre २००७-०८.doc

२. "परिच्छेद क्र.१" मध्ये मंजूर करण्यात आलेल्या सहाय्यक अनुदानाची रक्कम आहरण करुन संबंधितांना वितरीत करण्याकरिता श्री.आ.बा.डमाळे,कार्यासन अधिकारी, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई -३२ यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून व श्री. किरण कुरुंदकर, सह सचिव, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात आले आहे,

३. या सहाय्यक अनुदाना वरील खर्च रू.१,६५,०००/-( रूपये एक लाख पासष्ट हजार फक्त) " मागणी क्रमांक झेडडी-४ ३४५२-पर्यटन- ०१-पर्यटनासाठी पायाभूत सुविधा, १०१ - पर्यटन केंद्रे (०१) (०१) पर्यटन केंद्र उघडणे (३४५२ १९९ ४) ३१ सहायक अनुदाने," या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा, व तो सन २००८-०९ वर्षासाठी मंजूर असलेल्या आर्थिक तरतुदीतून भागविण्यात यावा. सदर निधी मासिक निधी विवरणपत्राप्रमाणे फेब्रुवारी, २००९ मध्ये वितरीत करण्यास मान्यता देण्यात आलेली आहे.

"हा शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला उपविभाग- एक, शासन निर्णय क्र. विअप्र १०००/प्र.क्र. ४६/२००१, दि. ११ जुलै २००१ मधील अनुक्रमांक-२७ नियम क्र. १४९ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारांतर्गत निर्गमित करण्यात येत आहे."

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(आ.बा.डमाळे)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा परीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), मुंबई,
महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा परीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
मुख्य अधिकारी, लोणावळा, नगरपरिषद, जिल्हा-पुणे
मुख्य अधिकारी, पांचगणी गिरीस्थान नगरपरिषद, जिल्हा-सातारा
मुख्य अधिकारी, पन्हाळा नगरपरिषद, जिल्हा-कोल्हापूर
मुख्य अधिकारी, माथेरान नगरपरिषद, जिल्हा-रायगड
मुख्य अधिकारी, महाबळेश्वर नगरपरिषद, जिल्हा पुणे.
वित्त विभाग (व्यय-१४/अर्थसंकल्प), मंत्रालय, मुंबई,
पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग (बीयुडी-१), मंत्रालय, मुंबई
निवड नस्ती, कार्यासन पर्यटन.



D:\MEHER JAN २००८\note Paryatan kendre २००७-०८.doc